शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळामार्फत राबविण्यात येणारा एच.एम.आय.एस. प्रकल्प रद्द करणेबाबत .

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वैशिवि- २०२२/प्र.क्र.८२/प्रशा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २०.०२.२०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः वैशिवि-२०१८/प्र.क्र. ३२१/प्रशा-१, दिनांक ०२/११/२०१९.

**प्रस्तावना :-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये येथे हॉस्पिटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन सिस्टिम (एच.एम.आय.एस.) हा रुपये ५१३,४३,११,१३५/- इतक्या खर्चाचा प्रकल्प महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत राबविण्यास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यता आदेश जवळपास तीन वर्षापूर्वीच्या स्थितीवर निर्गमित करण्यात आलेले होते. एच.एम.आय.एस. प्रकल्पाच्या अनुषंगाने केंद्र शासनाने आयुष्यमान भारत डिजिटल मिशन योजनेंतर्गत दिलेल्या सूचना विचारात घेऊन, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अखत्यारीत यापूर्वी संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करुन नवीन एचएमआयएस (२.००) प्रकल्प राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे. यास अनुसरुन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये येथे हॉस्पिटल मॅनेजमेंट इन्फॉर्मेशन सिस्टिम (एच.एम.आय.एस.) हा रुपये ५१३,४३,११,१३५/- इतक्या खर्चाचा प्रकल्प महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान महामंडळामार्फत राबविणे संबंधी दिनांक ०२/११/२०१९ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे निर्गमित प्रशासकीय मान्यतेचे आदेश सदर शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२३०२२०१४१२४६१९१३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3,
cn=MAHADEO JOGDAND
Date: 2023.02.20 01:41:18 -08'00'

**(म.गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) प्रधान सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन (र. व का.) विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
९) महासंचालक, National Informatic Centre, दिल्ली
१०) संचालक, National Centre for software Technology
११) संचालक, महाराष्ट्र माहिती व तंत्रज्ञान, मुंबई
१२) मा. मंत्री (व.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१४) महालेखापाल- १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१८) प्रकल्प समन्वयक (एचएमआयएस प्रकल्प), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय.मुंबई
१९) सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय/ दंत महाविद्यालये व संलग्नित रुग्णालये
२०) कक्ष अधिकारी (अलेप), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) नियोजन विभाग (कार्यासन- १४७५), मंत्रालय, मुंबई
२२) वित्त विभाग (व्यय-१३ / अर्थ-९), मंत्रालय, मुंबई
२३) मे. ईआयटी सर्व्हिसेस इंडिया प्रा. लि., बेंगलोर
२४) सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) निवडनस्ती (प्रशा-२).